**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः कअनि -१११७ /प्र.क्र. १०/१४-ब**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: २० जानेवारी, २०१७

<u>वाचा</u>:- महसुल व वन विभाग, शासन आदेश क्र.सीडीए-२०१६/प्र.क्र.८४२/ई, दि.२९.१२.२०१६ व कार्यालयीन आदेश क्र. ओएफएम-२०१६/प्र.क्र.८४२/ई, दि.०९.०१.२०१७.

**शासन आदेश**

श्री.सं. ना. सुराडकर, कक्ष अधिकारी, (निलंबित) महसुल व वन विभाग, यांना त्यांच्या विरुध्द मा. विशेष न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेला खटल्याच्या न्यायालयीन निर्णयाच्या अधीन राहून शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात यावे आणि त्यांना महसुल व वन विभागाव्यतिरिक्त मंत्रालयातील अन्य विभागामध्ये अकार्यकारी पदस्थापना देण्यात यावी, असा निर्णय निलंबन आढावा समितीच्या शिफारशीनुसार शासनाने घेतला आहे. त्यानुसार महसुल व वन विभागाने शासन आदेश क्रमांक ओएफएम-२०१६/प्र.क्र.८४२/ई, दिनांक २९.१२.२०१६ अन्वये श्री. सुराडकर, क.अ. यांना शासकीय सेवेत पुर्नस्थापित केले आहे.

महसुल व वन विभागाच्या दिनांक ०९.०१.२०१७ च्या आदेशानुसार श्री. संजय ना. सुराडकर, कक्ष अधिकारी यांना दिनांक ०२.०१.२०१७ (म.पू.) पासून महसुल व वन विभागामध्ये हजर करुन घेण्यात आले असून, दिनांक २९.१२.२०१६ च्या आदेशात नमूद केल्यानुसार श्री. सुराडकर, यांना पुढील पदस्थापनेकरिता सामान्य प्रशासन विभागाध्ये रूजू होण्याकरिता दिनांक ०९.०१.२०१७ (म.नं.) पासून कार्यमुक्त करण्यात आले आहे.

सदर आदेशांस अनुसरुन श्री. सं. ना. सुराडकर, कक्ष अधिकारी, यांच्या सेवा पुनर्स्थापित केल्यामुळे, त्यांची पदस्थापना संसदीय कार्य विभागामध्ये रिक्त असलेल्या कक्ष अधिकारी पदावर करण्यात येत आहे.

श्री. सं. ना. सुराडकर, कक्ष अधिकारी यांच्या सेवा दिनांक ०९.०१.२०१७ (म.नं.) पासून मूळ विभागाकडे सुपूर्द करण्यात आल्या आहेत. श्री. सुराडकर, कक्ष अधिकारी यांचा दिनांक १०.०१.२०१७ ते आदेशाच्या दिनांकापर्यंतचा सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्यास सामान्य प्रशासन विभागाची मान्यता देण्यात येत आहे. सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्याची कार्यवाही म.ना.से. (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ च्या नियम ९(१४) (एफ) नुसार, व शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ०२.०६.२००३ मधील तरतुदीनुसार संसदीय कार्य विभागाने करावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२०१५५८३८०००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.01.20 16:00:57 +05'30'

(ग.भि. गुरव)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्री.सं. ना. सुराडकर, कक्ष अधिकारी

**प्रत,**

१.प्रधान सचिव/सचिव, संसदीय कार्य विभाग,/म.व व.विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
२.सह / उप सचिव (आस्थापना), संसदीय कार्य विभाग/ महसुल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई,
३.उपसचिव (कार्यासन-११), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४.निवडनस्ती.